**परिवहन आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी गट ब संवर्गातील ४ अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०९१७/प्र.क्र.२११/परि-४,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०६ फेब्रुवारी २०२०

**वाचा :**

१) शासन निर्णय क्र. एमव्हिडी-०७१७/प्र.क्र.१८५/परि-४, दिनांक १६.०७.२०१९ व दि. २९.०८.२०१९.

**प्रस्तावना:-**

राज्यसेवा मुख्य परिक्षा २०१६ अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, (गट ब) संवर्गासाठी रुपये ९३००-३४८०० (ग्रेड पे रु. ४६००) (सहाव्या वेतन आयोगानुसार) (सातव्या वेतन आयोगानुसार एस-१६ रु.४४९००-१४२४००) या वेतनश्रेणीत ५ अधिसंख्य पदे दि. ०१.०८.२०१७ ते दि. ३१.०७.२०१९ पर्यंत दोन वर्षाच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास सदर्भ क्र. १ वरील दिनांक १६.०७.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. तसेच दिनांक २९.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि. ०१.०८.२०१९ ते दि. ३०.०९.२०१९ अखेरपर्यंत अथवा विभागीय संवर्ग वाटप होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल त्या दिनांकापर्यंत उक्त मुदतवाढ देण्यात आली होती. उपरोक्त ५ परिविक्षाधीन अधिका-यांपैकी श्री. शैलेश लाहोटी यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने उपजिल्हाधिकारी पदावर निवड झाल्याने त्यांना कार्यमुक्त करण्यात आले आहे. उर्वरित ४ अधिका-यांना पदस्थापना देण्यास लागणारा प्रशासकीय विलंब विचारात घेता, सदर ४ अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यसेवा मुख्य परीक्षा २०१६ अंतर्गत महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी, (गट ब) संवर्गासाठी रुपये ९३००-३४८०० (ग्रेड पे रु. ४६००) (सहाव्या वेतन आयोगानुसार) (सातव्या वेतन आयोगानुसार एस-१६ रु.४४९००-१४२४००) या वेतनश्रेणीत परिवहन आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या ५ अधिसंख्य पदांपैकी श्री. लाहोटी यांच्या राजीनाम्यामुळे १ अधिसंख्य पद रद्द करुन उर्वरित ४ अधिसंख्य पदांना दि. ०१.१०.२०१९ पासून संबंधित अधिका-यांचे पदस्थापनेचे आदेश निर्गमित होईपर्यंतच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२.	उक्त मुदतवाढीतील कालावधीत परिवीक्षाधीन सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी गट ब यांच्या अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च " मागणी क्र. बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०१४, वाहनावरील कर (०१) ००१, संचालन व प्रशासन (२०४१००१८) ०१ वेतन (योजनेतर) (दत्तमत)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातुन भागविण्यात यावा. तसेच सदर बाबीसाठी आवश्यक असल्यास अतिरिक्त रकमेसाठी सुधारीत अंदाजपत्रकामध्ये पुरक मागणीचा प्रस्ताव सादर करावा.

३.	सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००२०६१५०८५७७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f09466351527
3d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME
DEP.MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11
e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.02.06 15:46:16 +05'30'

**( द.ह. कदम )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.महालेखापाल, १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

६. सर्व जिल्हा कोषागार कार्यालये.

७. वित्त विभाग (कार्यासन क्र. व्यय ८ व वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई.

८. कक्ष अधिकारी (सीपीटीपी अ व ब)

९. निवडनस्ती, परिवहन-४.